**नागपूर महानगरपालिका सर्वसाधारण सभेने पारित केलेला ठराव क्र.२४४ दि.०२/०७/२०१८ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील कलम ४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नामपा-२०१९/प्र.क्र.०४/नवि-२६**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १२ जून, २०२४

**वाचा :-** १) आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांचे पत्र क्र. ३४६/आस्थापना, दि.०९/११/२०१८
२) नगरविकास विभाग शासन निर्णय क्र. नामपा-२०१९/प्र.क्र.०४/नवि-२६, दि. ०१/०८/२०१९
३) आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांचे पत्र क्र. साप्रवि/१२२/ओ, दि. १६.०२.२०२४

**प्रस्तावना :-**

नागपूर येथील ग्रेट नाग रोड , सि.स.नं.२ मधील प्लॉट नं.१२-अ वर उभारण्यात आलेल्या अनधिकृत बांधकामाच्या निष्कासनाच्या कार्यवाहीमध्ये श्री. कांतीकुमार लक्ष्मीप्रसाद सोनकुसरे, उप विभागीय अभियंता, लोककर्म विभाग (सेवानिवृत्त) यांनी गंभीर स्वरुपाचे गैरवर्तन केल्याचे आरोप झाले. यामुळे त्यांचेविरुध्द झालेल्या विभागीय चौकशीमध्ये सिध्द झाल्याने, दिनांक १४/०१/२००८ च्या आदेशान्वये त्यांच्या पुढील वार्षिक वेतनवाढ भविष्यातील वेतनवाढीवर कायम परिणाम करणारी ठरेल अशा रितीने पुढील तीन वर्षाचे कालावधीकरिता रोखण्याची शिक्षा देण्यात आली.

०२. याविरोधात, श्री. सोनकुसरे ह्यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम १९ नुसार नागपुर, महानगरपालिकेकडे अपील दाखल केले. या अपिलाबाबत सर्वसाधारण सभेने देण्यात आलेली शिक्षा रद्द करुन तीन वेतनवाढी देण्याबाबतचा ठराव क्र. २४४ दिनांक ०२/०७/२०१८ रोजी पारित केला.

०३. महानगरपालिकेने पारित केलेला सदरचा ठराव प्रशासनाने सादर केलेल्या प्रस्तावाशी विसंगत असल्यामुळे व तो महानगरपालिकेच्या आर्थिक हिताचा नसल्याने, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ कलम ४५१ नुसार आयुक्त, नागपूर महानगरपालिका यांनी संदर्भ क्र. १ येथील पत्राद्वारे प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने सदर ठराव तात्पुरता निलंबित करण्याबाबत संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णय निर्गमित करण्यात आला.

०४. शासन निर्णयात नमूद केल्यानुसार महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम ४५१(२) नुसार आदेशाच्या दिनांकापासून एक महिन्यात अभिवेदन करण्याची संधी देण्यात आली होती. त्यानुसार श्री. सोनकुसरे यांच्याकडून दि.२४/०८/२०१९ च्या पत्रान्वये सदर शासन निर्णय रद्द करण्याबाबत व महानगरपालिका ठराव क्र.२४४ कायम ठेवण्याबाबत शासनास अभिवेदन सादर केले. सदर अभिवेदनातील मुद्दे तसेच आयुक्त,नागपुर महानगरपालिका यांनी संदर्भाधीन पत्र क्र.३ द्वारे महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभेने संमत केलेला ठराव क्र २४४ दिनांक ०२/०७/२०१८ हा महानगरपालिकेस आर्थिक दृष्ट्या हानिकारक असल्याने सदर ठराव महानगरपालिका अधिनियमातील, १९४९ चे कलम ४५१(३) नुसार अंतिमत: विखंडित करण्याबाबत केलेली विनंती याचा विचार करुन निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नागपूर महानगरपालिका सर्वसाधारण सभेने पारित केलेला ठराव क्र.२४४ दिनांक०२/०७/२०१८ हा, महानगरपालिका प्रशासनाने सादर केलेल्या प्रस्तावाशी विसंगत व महानगरपालिकेच्या आर्थिक हिताचा नसल्याने सदरचा ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील कलम ४५१ (३) नुसार अंतिमत: विखंडीत करण्यात येत आहे.

०२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१२११०५२९३९२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षंकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2024.06.12 11:18:58 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.उप मुख्यमंत्री (गृह व विधी व न्याय) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त तथा प्रशासक, नागपूर महानगरपालिका, नागपूर
५) प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्यकारी अधिकारी, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६) श्री.कांतीकुमार लक्ष्मीप्रसाद सोनकुसरे, उप विभागीय अभियंता, लोककर्म विभाग (सेवानिवृत्त) द्वारा: आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर
७) निवडनस्ती, कार्यासन नवि-२६.